

**महाराष्ट्र शासन**


कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
मंत्रालय विस्तार,मादाम कामा मार्ग, दालन क्र. ५१८,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२.

दूरध्वनी क्र ०२२-२२८४५१३२
Email ID - d.shedmekhe@nic.in


---

**क्रमांक : क्र. पसंप्र -२०२०/प्र.क्र. ९५ (भाग-१०) /पदुम-१** **दिनांक : ०७. ०८.२०२०**

**<u>शासन आदेशः</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनिमयन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील ४(१) ४(२) व ४(३) तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.०७.०७.२०२० मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने पशुसंवर्धन विभागातील **पशुधन विकास अधिकारी, गट-अ** या संवर्गातील खालील कार्यरत अधिकाऱ्याची महसूली विभागातंर्गत **वैद्यकीय कारणास्तव** बदली करण्यात येत असून, विवरणपत्रातील त्यांच्या नावांसमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या नमूद ठिकाणी त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| नाशिक विभाग | | | |
|---|---|---|---|
| **अ. क्र** | **अधिका-यांचे नांव व सध्याच्या पदस्थापनेचे ठिकाण** | **बदलीनंतर पदस्थापनेचे ठिकाण** | **शेरा** |
| १. | २. | ३. | ४. |
| १. | डॉ. दत्तात्रय किसन इंगोले पविअ प.वै.द. श्रेणी-१ मुकटी, ता. धुळे | पविअ (वि) पसं भुम ता भुम जि. उस्मानाबाद या रिक्त पदावर | वैद्यकीय कारणास्तव |

२. उपरोक्त तक्त्यातील बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली आदेश प्राप्त होताच सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व संबंधित कार्यालय प्रमुखांनी त्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर हजर झाल्यानंतर तात्काळ कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्रासह त्यांचा रुजू अहवाल आयुक्त, पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्यामार्फत विहित मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब सादर करावा.

३. आयुक्त, पशुसंवर्धन, पुणे यांना कळविण्यात येते की, विहीत कालावधीत संबंधित अधिकारी रूजू न झाल्यास अथवा त्यांना कार्यालय प्रमुखांनी कार्यमुक्त/रुजू करण्याची कार्यवाही तात्काळ न केल्यास त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही प्रस्तावित करावी व तसा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा. याबाबतच्या कार्यवाहीचा अहवाल d.shedmekhe@nic.in या इ-मेल वर सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२००८१०१४०६४५२९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Dilipkumar Shedmekhe
Date: 2020.08.10 14:17:15 +05'30'

**( दि.ज.शेडमेखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र शासन ,मंत्रालय ,मुंबई-३२.
२. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र शासन ,मंत्रालय ,मुंबई-३२.
३. मा. प्रधान सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय ,मुंबई-३२.
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य ,पुणे .
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद .
६. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) औंध, पुणे
७. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त नाशिक/लातूर
८. संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,
९. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद ,संबंधित जिल्हे .
१०. महालेखापाल-१/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. संबंधित अधिकारी (व्दारा -आुयक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य ,पुणे)
१३. कार्यासन पदुम-१ (निवड नस्ती).